**भारताच्या संविधानातील अनुच्छेद क्र. १६६ अन्वये तयार करण्यात आलेल्या महाराष्ट्र शासन कार्य नियमावलीतील नियम १५ खालील शासनाच्या कामकाजासंबंधी काढलेल्या अनुदेशातील निदेश क्र. ४ च्या तरतूदीनुसार मंत्री ( वस्त्रोद्योग ), राज्यमंत्री ( वस्त्रोद्योग ) यांचेमध्ये वस्त्रोद्योग कक्षाच्या कामासंबंधीचे वाटप.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार व वस्त्रोद्योग विभाग,**
आदेश क्र.संकिर्ण-१०९९/सीआर-३०/टेक्स-५,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- १३ जानेवारी, २०००.

**आदेश :-**

भारताच्या संविधानातील अनुच्छेद क्र. १६६ खाली तयार करण्यात आलेल्या महाराष्ट्र शासन कार्य नियमावलीतील नियम १५ खाली शासनाच्या कामकाजाबाबत काढलेल्या अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग क्र. आरओबी-१०९३/सीआर-२/१३/अठरा ( र. व का. ), दि. ०६.०४.१९९३ अनुसार मा. मंत्री ( वस्त्रोद्योग ) व मा. राज्यमंत्री ( वस्त्रोद्योग ) यांच्यामध्ये वस्त्रोद्योग कक्षाच्या कामकाजासंबंधी विभागणी अनुक्रमे या आदेशात जोडलेल्या अनुसूची '' अ '' व '' ब '' प्रमाणे राहील. हे आदेश तातडीने अंमलात येतील. याबाबतीत खालील पध्दती सर्वसाधारणपणे अवलंबली जाईल.

२. अर्थसंकल्प व प्रशासन हे विषय मा. मंत्री ( वस्त्रोद्योग ) स्वत: हाताळतील इतर सर्व विषयाबाबत अंतिम निर्णयाचे अधिकार मा. मंत्री ( वस्त्रोद्योग ) यांचे राहतील.

३. लोकसभा, राज्यसभा, विधानसभा व विधानपरिषद यांच्याकडे पाठवावयाचे उत्तरे, वस्त्रोद्योग कक्षाबाबत करावयाचे एखादे निवेदन व इतर धोरणात्मक बाबीविष्ज्ञयी सर्व प्रकरणे तसेच केद्र शासनाकडे पाठविण्याचे धोरणात्मक संदर्भ मा. राज्यमंत्री ( वस्त्रोद्योग ) यांचेमार्फत मा. मंत्री ( वस्त्रोद्योग ) यांच्याकडे प्रस्तुत करण्यात यावेत.

४. तातडीच्या, महत्वाच्या धारीका मा. मंत्री ( वस्त्रोद्योग ) यांच्या आदेशानुसार त्यांना सादर करण्यात याव्यात.

महाराष्ट्राचे राज्यपाली यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही /-
( सि. मं. इनामदार )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन,
सहकार व वस्त्रोद्योग विभाग.

प्रति,

१. राज्यपालांचे सचिव ( पत्राने )

... २/-

२. मुख्यमंत्री यांचे सचिव
३. सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव
४. सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
५. मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग
६. सर्व अतिरिक्त मुख्य सचिव, सर्व प्रधान सचिव व सचिव मंत्रालयीन विभाग
७. सचिव ( वस्त्रोद्योग ), सचिव ( सहकार व पणन ), सहकार व वस्त्रोद्योग विभाग.
८. सर्व मंत्रालयीन विभाग.
९. सर्व उप सचिव, अवर सचिव व कक्ष अधिकारी ( सहकार कक्ष )
१०. उप सचिव, अवर सचिव, कक्ष अधिकारी ( वस्त्रोद्योग कक्ष )
११. सामान्य प्रशासन विभाग ( रचना व कार्य कक्ष )
१२. महासंचालक, प्रसिध्द व जनसंपर्क, मंत्रालय,
१३. सह संचालक, उप संचालक, सी. एम. आय. युनिट,
सहकार व वस्त्रोद्योग विभाग.
१४. निवड नस्ती.

श्रीनाथ १३.१.२०००.

मा. मंत्री ( वस्त्रोद्योग ) यांच्याकडे सोपविण्यात येणाऱ्या कामाची यादी.

अ. मा. मंत्री ( वस्त्रोद्योग ) :

१. हातमाग, यंत्रमाग व वस्त्रोद्योग संचालनालय,
२. सहकारी सूत गिरण्या.
३. सहकार सूत गिरण्यांना बँकेत खाते / नोंदण / आठव्या पंचवार्षिक योजनेत गिरण्या उभारण्यासाठी परवानगी देण्याबाबतची प्रकरणे व निवडलेल्या गिरण्यांच्या आर्थिक बाबी.
४. हातमाग, यंत्रमाग संस्था व सहकारी सूत गिरण्यांवर शासनातर्फे निर्देशित करावयाची संचालक मंडळे.
५. मूल्य निर्धारणे समिती.
६. वस्त्रोद्योग विभागातंर्गत सहकारी संस्थांवरील प्रशासकांच्या नेमणुका.
७. कापड गिरण्यांबाबतच्या धोरणात्मक बाबी.
८. आजारी / बंद कापड गिरण्यांना सहाय्य.
९. कापड गिरण्यांचे नुतनीकरण.
१०. लोकर प्रक्रिया संस्थांबाबत धोरणात्मक बाबी.
११. वस्त्रोद्योग विभागातंर्गत सर्व महामंडळांविषयी धोरणात्मक बाबी.
१२. वस्त्रोद्योग विभागातंर्गत सहकारी संस्थांचे प्रकरणाविषयी कायदेविषयक बाबी.
१३. अवसायनातील सहकारी संस्थांबाबतचे शासकीय स्तरावरील निर्णय.
१४. विधान मंडळाच्या कामकाजाबाबतच्या बाबी.
१५. रेशीम उद्योगाशी संबंधीत बाबी.

*************************************************************

मा. राज्यमंत्री ( वस्त्रोद्योग ) यांच्याकडे सोपविण्यात येणाऱ्या कामाची यादी.

ब. मा. राज्यमंत्री ( वस्त्रोद्योग ) :

१. हातमाग, यंत्रमाग संस्था व त्यांच्याशी संबंधित प्रशासकीय बाबी.
२. वस्त्रोद्योग विभागातंर्गत सर्व महामंडळे व त्यांच्याशी संबंधीत प्रशासकीय बाबी.
३. वस्त्रोद्योग विभागातंर्गत सर्व सहकारी संस्थांबाबत अपील व पुनर्निरिक्षण अर्ज.
४. वस्त्रोद्योग विभागातंर्गत राष्ट्रीय सहकारी विकास निगमातंर्गत योजनाबाबत बाबी.
५. लोकर प्रक्रिया संस्था सहकारी सूत गिरण्या-कापड गिरण्या.
६. विधानमंडळाच्या कामकाजाबाबतच्या बाबी.
७. हातमाग संचालनालयातील आस्थापनाविषयक बाबी.
८. विधानमंडळाचे कामकाजा संदर्भात आश्वासन समितीचे अहवाल, सार्वजनिक उपक्रम, सार्वजनिक लेखासमिती.
९. पंचवार्षिक योजना.
१०. २० कलमी कार्यक्रम.
११. अवसायनातील आजारी सहकारी सूत गिरण्यांचे पुनर्वसन.
१२. आठव्या पंचवार्षिक योजनेच्या कालावधीत बिघडलेल्या गिरण्यासाठीचे आर्थिक प्रस्ताव.
१३. मूल्य निर्धारण समिती.
१४. वस्त्रोद्योग विभागातंर्गत संस्थांवर प्रशासक नियुक्तीचे प्रस्ताव.
१५. महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ व तत्संबंधीच्या बाबी.
१६. रेशीम उद्योगाशी संबंधीत बाबी.

***********************************************************

किशोर १३०१००